**राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेसाठी शिष्यवृत्ती मंजूर झालेल्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्तीची रक्कम अदा करणेस मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०२१/(६६/२१)/मशि-३,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार इमारत, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ फेब्रुवारी, २०२२.

वाचा : संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्र.उशिसं/शिष्य-२०२१-२२/तरतूद/१४८२६, दिनांक २९/१२/२०२१.

प्रस्तावना :

संचालक, उच्च शिक्षण यांच्या संदर्भीय पत्रान्वये राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेसाठी (२२०२ १४५६) ३४- शिष्यवृत्त्या/विद्यावेतने या लेखाशिर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतूदीतून सन २०१८-१९ करीता ०२ विद्यार्थ्यांकरीता रु.२,२५०/-, सन २०१९-२० करीता एकूण २५ विद्यार्थ्यांसाठी प्रथम हप्त्याची रक्कम रु. १,०१,१६६/- व सन २०२०-२१ करीता १४१२ विद्यार्थ्यांची प्रथम हप्त्याची रक्कम रु.३९,४५,७५८/- व ७४२४४ विद्यार्थ्यांसाठी द्वितीय हप्त्याची रक्कम रु.२४,२४,४०,७०८/- अशा एकूण ७५६८३ विद्यार्थ्यांची महाआयटी कडून शिष्यवृत्ती मंजूर झालेल्या अलॉटमेंटसाठी रु.२४,६४,८९,८८२/- इतक्या रक्कमेचे देयक अदा करणेबाबत प्रस्तावित करण्यात आले आहे. त्यास अनुसरुन सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात प्रलंबित शिष्यवृत्तीची रक्कम अदा करण्याकरीता प्रस्तुत योजनेसाठी अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतूदीतून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

प्रस्तावनेत नमुद केल्याप्रमाणे राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती या योजनेतंर्गत सन २०१८-१९, २०१९-२० व सन २०२०-२१ करीता महाआयटी कडून शिष्यवृत्ती मंजूर झालेल्या अलॉटमेंटनुसार मंजूर विद्यार्थ्यांची प्रलंबित शिष्यवृत्तीची रक्कम अदा करण्यासाठी रु.२४,६४,८९,८८२/- (अक्षरी रुपये चोवीस कोटी चौसष्ठ लक्ष एकोणनव्वद हजार आठशे ब्याऐंशी फक्त) इतकी तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. या बाबीवर होणार खर्च मागणी क्र.डब्ल्यू -०२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण ८० सर्वसाधारण ८०० इतर खर्च, (०२) संकीर्ण (०२) (०९) राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना (कार्यकम) (२२०२ १४५६) ३४ शिष्यवृत्त्या/विद्यावेतने या तपशीलवार लेखाशिर्षांतर्गत २०२१-२२ या वर्षात मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३ हा शासन निर्णय, नियोजन विभाग व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ अनुक्रमे क्र.११/१४७१, दिनांक १०/०१/२०२२ व क्र.९९/२०२२/व्यय-५, दिनांक २८/०१/२०२२ नुसार प्राप्त झालेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत असून शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४/०६/२०२१ व दिनांक १४/१०/२०२१ मधील अटी व शर्तीची पूर्तता होत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२२०२१४१५२९१८८५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Hemantkumar
Pandharinath Baviskar

Digitally signed by Hemantkumar Pandharinath Baviskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=71de9bdf8c28541d92a5cd36d722315bab7f006ec5420633722d42e0976d82a8, cn=Hemantkumar Pandharinath Baviskar
Date: 2022.02.14 15:31:18 +05'30'

**( हे. पं. बाविस्कर )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. महालेखापाल ( लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
३. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
४. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५. कक्ष अधिकारी, साशि.१, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. निवड नस्ती मशि-३, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.